**किमान आधारभूत किंमत योजनेंतर्गत सन २०१९-२० या हंगामामध्ये खरेदी केलेल्या कापसाचे चुकारे शेतक-यांना अदा करण्यासाठी महाराष्ट्र राज्य सहकारी कापूस उत्पादक पणन महासंघास बँक ऑफ इंडिया, मुंबई यांचेकडून ७.७५% या व्याजदराने घ्यावयाच्या रु.१८०० कोटी कर्जास शासन हमी मंजूर करणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## वित्त विभाग

**शासन निर्णय क्रमांक : शाहमी-२०२०/सपववि/प्र.क्र.१७/अर्थबळ,**

मंत्रालय, मुंबई-३२

दिनांक :- २४ फेब्रुवारी, २०२०

<u>वाचा</u> -१) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.शाहमी -१०९९/प्रक्र.६८/शा.हमी, दि. ५.११.१९९९.

२) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.शाहमी -१००८/प्रक्र.१८/शा.हमी,दि.२८.४.२००८

३) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी कापूस उत्पादक पणन महासंघ मर्या. यांचे क्र. कापूस/शासन हमी/१९.२०/१८७३, दिनांक १६/०१/२०२० चे पत्र.

**<u>प्रस्तावना:</u>**

केंद्र शासनाने भारतीय कपास निगम या संस्थेची सन २०१९-२० मध्ये किमान आधारभूत दराने कापूस खरेदी करण्यासाठी प्रमुख अभिकर्ता म्हणून नेमणूक केली आहे. भारतीय कपास निगमने सदर योजनेच्या अंमलबजावणीसाठी राज्यात महाराष्ट्र राज्य सहकारी कापूस उत्पादक पणन महासंघ मर्यादित, मुंबई यांची उपअभिकर्ता म्हणून नियुक्ती केली आहे. सदर याजनेंतर्गत खरेदी केलेल्या कापसाची देणी शेतकऱ्यांना वेळीच अदा करण्याकरिता महाराष्ट्र राज्य सहकारी कापूस उत्पादक पणन महासंघास बँक ऑफ इंडिया, मुंबई यांचेकडून ७.७५% या व्याजदराने रु.१८०० कोटी (रुपये एक हजार आठशे कोटी ) इतके कर्ज उभारण्याकरीता शासन हमी देण्यास व शासन हमीवरील हमीशुल्क माफ करण्याच्या सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागाच्या प्रस्तावास मा. मंत्रिमंडळाने दि.५.२.२०२० रोजीच्या बैठकीत मंजूरी दिली आहे. त्यानुषंगाने शासन हमीचा शासन निर्णय निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u> :**

किमान आधारभूत किंमत योजनेअंतर्गत हंगाम २०१९-२० मध्ये भारतीय कपास निगम यांच्या वतीने खरेदी केलेल्या कापसाची देणी वेळीच अदा करण्यासाठी महाराष्ट्र राज्य सहकारी कापूस उत्पादक पणन महासंघ, मुंबई (ऋणको) यांना बँक ऑफ इंडिया, मुंबई (धनको) यांचेकडून ७.७५% या व्याजदराने एकूण रु.१८०० कोटी (रुपये एक हजार आठशे कोटी) इतके कर्ज उभारण्यासाठी शासन हमी मंजूर करण्यात येत आहे.

२. सदर शासनहमीवर कर्ज उलचण्याची मुदत शासन निर्णय निर्गमित केल्याच्या दिनांकापासून ६ महिन्यांच्या कालावधीपर्यंत वैध राहील.

३. धनको बँकांसमवेत शासन हमीवर घेण्यात येणाऱ्या कर्जासंबंधी करण्यात येणाऱ्या करारपत्रात खालील अटी व शर्तीचा समावेश करण्यात यावा.

३.१) शासन हमी एकूण रु. १८०० कोटी इतक्या कर्जाच्या रकमेपुरतीच सिमीत राहील.

३.२) सदर शासनहमीची मुदत शासन निर्णय निर्गमित केल्याच्या दिनांकापासून ६ महिन्यांच्या कालावधीपर्यंत वैध राहील.

३.३) बँकेकडून प्राप्त होणारे कर्ज, भारतीय कपास निगम कडून प्राप्त होणारी रक्कम तसेच शेतक-यांना वितरीत करावयाची रक्कम व बँकांची परतफेड याकरिता कर्ज देणाऱ्या धनको बँकांमध्ये महाराष्ट्र राज्य सहकारी कापूस उत्पादक पणन महासंघ लि.मुंबई या संस्थेच्या नावे स्वतंत्र Escrow A/C उघडण्यात येईल व या अकाऊन्ट मधून घेतलेल्या कर्जाची परतफेड करण्यात येईल.

३.४) धनको बँकांकडील कर्जाची परतफेड करण्यास विलंब झाल्यास त्याकरिता आकारण्यात आलेल्या दंडनीय व्याजाकरीता व इतर कोणत्याही देय रकमांसाठी शासन हमी लागू होणार नाही.

३.५) महाराष्ट्र राज्य सहकारी कापूस उत्पादक पणन महासंघा कडून कर्ज फेडीत कसूर झाल्यास कर्जाच्या वसूली करीता पुरेशा मत्तेची प्रतिभूती (Security) घेतल्यानंतरच धनको बँका कर्ज मंजूर करतील. सदर मत्तेची तपासणी वेळोवेळी व कमीत कमी सहा महिन्यातून एकदा तरी संबंधित बँक करेल.

३.६) महाराष्ट्र राज्य सहकारी कापूस उत्पादक पणन महासंघा कडून कर्ज फेडीत कसूर झाल्यास फेडरेशनच्या चल / अचल मालमत्तेची विक्री / लिलाव (Auction) करुन कर्ज वसुलीची प्रक्रिया पूर्ण करावी. तसेच, कर्ज वसूलीसाठी सर्वतोपरी प्रयत्न केल्याशिवाय धनको बँकांना हमीपूर्ततेकरिता शासन हमीच्या प्रतिभूतीचा वापर करता येणार नाही.

३.७) महाराष्ट्र राज्य सहकारी कापूस उत्पादक पणन महासंघाकडून कर्जाच्या परतफेडीबाबत अथवा व्याजाची रक्कम देण्याबाबत होणा-या कसुरीची सूचना शासनास ९० दिवसाच्या आत देणे धनको बँकांना बंधनकारक असेल.

३.८) धनको बँका हया राज्य शासनाच्या पूर्व अनुमतीशिवाय महाराष्ट्र राज्य सहकारी कापूस उत्पादक पणन महासंघास आदेशामध्ये विहित केलेल्या मर्यादेपेक्षा अधिक कर्ज देणार नाहीत. तसेच सदर प्रयोजनासाठी ऋणको इतर कोणत्याही वित्तीय संस्थेकडून कर्ज घेणार नाही.

३.९) धनको बँकाकडून महाराष्ट्र राज्य सहकारी कापूस उत्पादक पणन महासंघाच्या चल / अचल मालमत्तेची विक्री वसुलीचा निर्णय झाल्यास त्यासाठी एक समिती स्थापन करावी व त्या समितीमध्ये सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग व वित्त विभागाचा प्रत्येकी एक प्रतिनिधी घेण्यात यावा. चल / अचल मालमत्तेची विक्री/ लिलाव करताना मुल्यांकन त्रयस्थ संस्थेकडून शासन नियमानुसार करणे आवश्यक राहील. तसेच, उक्त समितीमधील शासनाच्या दोन्ही प्रतिनिधींच्या अहवालासह लिलाव प्रक्रियेचे अंतिमीकरणास शासनाची मान्यता घेणे आवश्यक राहिल.

वरील (३.१) ते (३.९) पैकी कोणत्याही अटीचा भंग झाल्यास शासन हमी अवैध होईल.

**४.** महाराष्ट्र राज्य सहकारी कापूस उत्पादक पणन महासंघाला रु. १८०० कोटीची शासन हमी अ.क्र. १ येथील दिनांक ५.११.१९९९ मधील शासन निर्णयामध्ये नमूद केलेल्या अटी तसेच खालील अटीं व शर्तींच्या अधीन राहील:-

४.१) महाराष्ट्र राज्य सहकारी कापूस उत्पादक पणन महासंघ हे Principal Debtor राहतील.

४.२) धनको बँकांकडून घेण्यात येणा-या कर्जाचा वापर फक्त कापसाची देणी वेळीच अदा करण्याकरिता करण्यात यावा.

४.३) महाराष्ट्र राज्य सहकारी कापूस उत्पादक पणन महासंघाने खरेदी केलेल्या कापसाची देणी अदा करण्यासाठी लागणारी रक्कम विचारात घेऊन आवश्यक तेवढयाच कर्जाची उचल करण्यात यावी.

४.४) या शासन निर्णयासोबत जोडलेल्या **प्रपत्र "ब"** मध्ये नमूद वेळापत्रकानुसार सदरचे कर्ज (मुद्दल + व्याज) फेडण्याची तसेच, कर्जफेडीकरीता उत्पन्नाचे स्त्रोत निर्माण करण्याची संपूर्ण जबाबदारी महाराष्ट्र राज्य सहकारी कापूस उत्पादक पणन महासंघ/सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग यांची राहील.

४.५) सदर शासन हमीवर देण्यात आलेल्या कर्जाचे दायित्व शासनावर येणार नाही याबाबत सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागाने दक्षता घ्यावी.

४.६) महाराष्ट्र राज्य सहकारी कापूस उत्पादक पणन महासंघ त्यांच्या आर्थिक स्थितीबाबतचा अहवाल या शासन निर्णयासोबत जोडलेल्या प्रपत्र-अ मध्ये दर सहा महिन्यांनी (३१मार्च/३०सप्टेंबर) सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभागास सादर करेल.

४.७) महाराष्ट्र राज्य सहकारी कापूस उत्पादक पणन महासंघाने विहित कार्यपध्दतीने लेखा परिक्षित केलेल्या त्यांच्या लेख्यांची एक प्रत शासनास सादर करावी.

**५. <u>हमी शुल्क</u>**

मा.मंत्रिमंडळाने निर्णय घेतल्यानुसार सदर शासन हमीवरील हमीशुल्क माफ करण्यात येत आहे. तथापि, शासन हमीवरील घेतलेल्या कर्जाच्या परतफेडीबाबत संनियंत्रणाची जबाबदारी सहसचिव/ उपसचिव, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई-३२ यांची राहील.

**६.** हा शासन निर्णय सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागाच्या नस्ती क्र. कापूस-२०१९/ प्र.क्र.५४/ १०स वरील प्रस्ताव व वित्त विभागाचा शासन हमी क्र. ९/२०१९-२० नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

**७.** महाराष्ट्र राज्य सहकारी कापूस उत्पादक पणन महासंघ लि. मुंबई यांनी कर्ज घेण्यासंबंधी करावयाच्या करारपत्रावर स्वाक्षरी करण्याकरिता सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागातील संबंधीत सहसचिव/ उपसचिव व वित्त विभागातील उप सचिव (अर्थबळ) यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२००२२४१५३३०४०९०५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Jayant Balkrishna Kulkarni

Digitally signed by Jayant Balkrishna Kulkarni
DN: CN = Jayant Balkrishna Kulkarni, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Finance Department
Date: 2020.02.24 15:40:22 +05'30'

**( ज. बा. कुलकर्णी )**
**उपसचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१) मा. राज्यपालाचे सचिव,

२) मा. मुख्यमंत्र्याचे प्रधान सचिव,

३) मा. उपमुख्यमंत्र्याचे प्रधान सचिव,

४) मा. विरोधी पक्ष नेता, विधानसभा/विधान परिषद, विधानमंडळ, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

५) सर्व विधानमंडळ सदस्य, विधानमंडळ, मुंबई,

६) सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे स्वीय सहाय्यक,
७) महालेखापाल, महाराष्ट्र-१/२(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
८) महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
९) ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानभवन सचिवालय, मुंबई (५ प्रती)
१०) बहुजन समाज पार्टी, डी-१, इन्सा इटमेंट, आझाद मैदान, मुंबई,
११) भारतीय जनता पार्टी, महाराष्ट्र प्रदेश, सी.डी.ओ.बॅरेक्स क्र.१, योगक्षेमसमोर, वसंतराव भागवत चौक, नरिमन पॉईन्ट, मुंबई-२०
१२) भारतीय कम्युनिस्ट पार्टी, महाराष्ट्र कमिटी, ३१४, राज भुवन, एस.व्ही.पटेल रोड, मुंबई-४.
१३) भारतीय कम्युनिस्ट पार्टी, (मार्स्कवादी) महाराष्ट्र कमिटी, जनशक्ती हॉल, ग्लोव मिल पॅलेस, वरळी, मुंबई-१
१४) इंडियन नॅशलन कॉंग्रेस पार्टी, महाराष्ट्र प्रदेश कॉंग्रेस (आय) समिती, टिळक भवन, काकासाहेब गाडगीळ मार्ग, दादर, मुंबई -२५.
१५) नॅशनॅलिस्ट कॉंग्रेस पार्टी, राष्ट्रवादी भवन, फ्री प्रेस जर्नल मार्ग, नरिमन पॉईन्ट, मुंबई-२१.
१६) शिवसेना, शिवसेना भवन, गडकरी चौक, दादर, मुंबई-४०० ०२८.
१७) प्रधान सचिव (पणन), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
१८) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी कापूस उत्पादक पणन महासंघ लि., २ रा मजला, २०१, जॉली भवन-२, अपो. निर्मला निकेतन, ७ न्यू मरीन लाईन्स, चर्चगेट, मुंबई-२०
१९) बँक ऑफ इंडिया, मुंबई ओव्हरसीज शाखा, बँक ऑफ इंडिया भवन, ७०-८०, महात्मा गांधी मार्ग, फोर्ट, मुंबई-४०० ००१.
२०) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
२१) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
२२) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
२३) वित्त विभाग (ऋण व हमी संनियंत्रण कक्ष/व्यय-२), मंत्रालय, मुंबई-३२.
२४) कक्ष अधिकारी (१० स) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
२५) निवडनस्ती/ अर्थबळ.

------------

# ANNEXURE A

**Proforma in which the information in respect of repayment of loan and financial liability of the borrower is to be submitted by the lending institute to the Government every six month (1st April/ 1st Oct)**

1 **Name of Lending Institute:**

2 **Principal Debtor:**

3 **Name of Administrative Dept:**

4 **Guarantee No:**

5 **Date of Validity of Guarantee:**

6 **Report for the period from: To**

**Guarantee & Repayment during the period** **(Rupees)**

| | | Principal | Interest | Total |
|---|---|---|---|---|
| 1 | Outstanding guarantee at beginning of the period | | | |
| 2 | Additional guarantee sanctioned, if any during the period | | | |
| 3 | Toal Outstanding ( 1+ 2 ) | | | |
| 4 | Repayment of loan | | | |
| 5 | Balance at end of the period ( 3 - 4 ) | | | |
| 6 | Amount Credited in to Escrow A/C | | | |
| 7 | Net Balance ( 5 - 6 ) | | | |

7 **Payment of Guarantee fees** **(Rupees)**

| | Outstanding Amount | G . F. | Penal Fee | Total |
|---|---|---|---|---|
| 1 | Outstanding at the Beginning | | | |
| 2 | G. F. Paid (Rs.) | | | |
| 3 | Date | | | |
| 4 | Challan No. | | | |
| 5 | Balance at end of the period ( 1 - 2 ) | | | |

8 **Types of assets taken as security against amount of loan / outstanding**

| Description Secured | Estimated Value | How |
|---|---|---|
| (!) | | |
| (ii) | | |
| (iii) | | |
| Total | | |

( P.T.O.)

| | |
|---|---|
| **9** Types of inspection of assets / due diligency by lending institute during last 6 months to ensure loans are properly secured. | |
| **10**. Financial Health of Principal Debtor<br>(I) Total Turnover of the Principal Debtor<br>(II) Total Profits<br>(iii) % of profits as % of loan amount | |
| **11.** Is in the opinion of lending institute,the borrowing institute in a position to service the debt against which government guarantee is given | |
| **12**. Is in view of the lending institute, the borrowing institute being managed efficiently | |
| **13.** If not, type of corrective action proposed to be taken by lending institute | |
| **14**. Has the lending institute ensured that no further loans have been taken by the borrowing institute since the government guarantee was given | |
| **15.** Has the lending institute ensured that the guarantee fees has been paid to the Goveernment in order to keep the guareante alive and valid | |

**प्रपत्र-ब**

## कर्जाच्या परतफेडीचे वेळापत्रक (Repayment Schedule)

(रुपये कोटीत)

| अ.क्र. | महिना | उचलण्यात यावयाच्या कर्जाची रक्कम | कर्जाची परतफेड | अदा करावयाचे व्याज |
|---|---|---|---|---|
| १ | डिसेंबर-२०१९ | ३१०.०० | ०.०० | २.०४ |
| २ | जानेवारी -२०२० | ७००.०० | ७०.०० | ४.६१ |
| ३ | फेब्रुवारी-२०२० | ३००.०० | १००.०० | १.७८ |
| ४ | मार्च-२०२० | २००.०० | ४००.०० | १.३२ |
| ५ | एप्रिल-२०२० | २००.०० | ६००.०० | १.२७ |
| ६ | मे-२०२० | ९०.०० | ६३०.०० | ०.५९ |
| | **एकूण** | **१८००.००** | **१८००.००** | **११.६१** |

## परतफेडीचे स्त्रोत (Sources of Repayment)

(रुपये कोटीत)

| अ.क्र. | उत्पन्नाचे स्त्रोत | अपेक्षित रक्कम (रुपये) | कालावधी |
|---|---|---|---|
| १ | सरकी (seed) विक्री | ०४२९.०० | मार्च,२०२० पर्यंत |
| २ | कापूस गाठी विक्री | १२६०.०० | एप्रिल ते नोव्हेंबर २०२० |
| ३ | वस्त्रोद्योग मंत्रालय, नवी दिल्ली | ०१११.०० अधिक अन्य अनुज्ञेय खर्च | कॉटन कॉर्पोरेशन ऑफ इंडिया मार्फत वस्त्रोद्योग मंत्रालयाकडे प्रलंबित दाव्यांची पूर्तता त्वरीत करण्याबाबत कापूस पणन महासंघामार्फत सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभागाने प्रत्यक्ष पाठपुरावा करावा. |

******************